**अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी आरक्षण ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१७१५ / प्र.क्र.२९७ / क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
तारीख: १९ जानेवारी, २०१७

**वाचा:-**

शासन निर्णय क्रमांकः राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२,दिनांक ०१ जुलै, २०१६

**प्रस्तावना:-**

अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना शासकीय, निमशासकीय व इतर क्षेत्रात नोकरीसाठी आरक्षण ठेवण्यासंदर्भात दिनांक १ जुलै, २०१६ रोजी सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. या शासन निर्णयान्वये दिनांक ३० डिसेंबर, २०१३ चा शासन निर्णय अधिक्रमित झाला आहे. दिनांक ३० डिसेंबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनने मान्यता काढलेल्या संघटनेने, फेब्रुवारी, २०११ नंतर आयोजित केलेल्या स्पर्धांमध्ये प्राविण्य मिळविलेल्या ज्या खेळाडूंची प्रमाणपत्रे दिनांक ३१ डिसेंबर, २०१३ पर्यंत अवैध ठरविण्यात आली होती, त्या खेळाडूंची प्रमाणपत्रे दिनांक २८ फेब्रुवारी,२०१४ पर्यंत पुनर्तपासणीसाठी क्रीडा संचालनालयास पाठविली तर त्याची क्रीडा संचालनालयाने त्या संघटनांना इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनची मान्यता आहे असे गृहित धरून पुनर्तपासणी करून द्यावी असे निश्चित केले होते. दिनांक १ मार्च, २०१४ पासून खेळाडूंच्या प्रमाणपत्रांची पुनर्तपासणी करण्यात येणार नसल्याचा निर्णय शासनाने घेतला होता. तथापि, एकाच स्पर्धेतील विजयी संघाच्या खेळाडूंना पात्र व त्याच संघातील काही खेळाडूंना अपात्र करावे लागल्याची परिस्थिती निर्माण झाली आहे.

२. त्यामुळे खेळाडूंचे नुकसान होवू नये व त्यांचे हित जपले जावे या दृष्टीने सध्या निर्माण झालेल्या परिस्थितीवर उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनने त्यांच्या दिनांक ११ जुलै, २०११ च्या पत्रान्वये ३१ राष्ट्रीय संघटनांच्या काढलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने पुढील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

अ) इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनने दिनांक ११ फेब्रुवारी, २०११ पासून मान्यता काढलेल्या अधिकृत राष्ट्रीय संघटनांनी व अशा अधिकृत राष्ट्रीय संघटनानी संलग्नता दिलेल्या राज्य संघटनांनी, आयोजीत केलेल्या, दिनांक ३१ डिसेंबर २०१३ पर्यंतच्या राष्ट्रीय / राज्य स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन प्राविण्य प्राप्त करणाऱ्या खेळाडूंची ५ % खेळाडू आरक्षणातंर्गत विविध विभागामार्फत संचालनालयास पडताळणी करण्याकरिता प्राप्त होणारी, क्रीडा प्रमाणपत्रे पडताळणी करताना, संबंधित खेळाच्या राष्ट्रीय संघटनेस इंडियन ऑलिम्पिक असोसिएशनची मान्यता आहे, असे गृहित धरुन पडताळणी करुन द्यावी.

ब) तथापि, अशा मान्यता काढलेल्या राष्ट्रीय संघटनांव्दारा व त्यांनी संलग्नता दिलेल्या राज्य संघटनांनी दिनांक १ जानेवारी,२०१४ पासून आयोजित करण्यात येणाऱ्या राज्य / राष्ट्रीय क्रीडा स्पर्धांची क्रीडा प्रमाणपत्रे पडताळणी करताना दिनांक १ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयाच्या तरतुदी लागू राहतील.

क) सदर शासन निर्णय खालील प्रकरणी लागु राहील :-

I. दिनांक ०१ ऑगस्ट, २०१६ पुर्वी शासन सेवेत खेळाडूंच्या ५ टक्के आरक्षणांतर्गत निवड झालेल्या खेळाडूंचे प्रमाणपत्र, संबंधित नियुक्ती प्राधिकरणाकडून, क्रीडा व युवकसेवा संचालनालयास प्राप्त झाल्यास सदर प्रमाणपत्रांची पुनर्पडताळणी करुन देण्यात येईल .

II. दिनांक ११ फेब्रुवारी, २०११ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०१३ दरम्यान राष्ट्रीय / राज्य स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन प्राविण्य प्राप्त केलेल्या खेळाडूंच्या आगामी प्रमाणपत्र पडताळणीच्या प्रस्तावांकरीता व त्या अनुषंगाने आयुक्त, क्रीडा व युवकसेवा संचालनालय / संबंधित विभागीय क्रीडा उपसंचालक यांच्याकडे, ५ टक्के खेळाडू आरक्षणांतर्गत प्रमाणपत्र पडताळणीच्या प्रलंबित प्रकरणांसंदर्भात लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११९१६००३३८०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Suryakant Pradhan

Digitally signed by Prashant Suryakant Pradhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f741f305e0506537a7efc111fdb5be9b1db4013bb8fe7a516ce30b694acca8f, cn=Prashant Suryakant Pradhan
Date: 2017.01.19 16:04:18 +05'30'

**( प्र.सू.प्रधान )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्यसचिव यांचे सहसचिव
५. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक, शिक्षण (प्राथमिक/माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
९. लोकायुक्त, महाराष्ट्र नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३.सर्व मंत्रालयीन विभाग

१४.सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख
१५.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६.सर्व शिक्षणाधिकारी,जिल्हा परिषदा
१७.सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य(संचालनालयामार्फत)
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय,मुंबई (यांना व्यापक प्रसिध्दीच्या विनंतीसह)
१९.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
२०.निवड नस्ती, क्रीयुसे-२.